**सन २०१७-१८ मधील मंजूर अर्थसंकल्पीत**
**<u>तरतूदीचे वितरण करणेबाबत</u>.**
**सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी**
**संस्था(अनिवार्य) (२४२५ ००११).**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. पुरस्कार ०३१७ / प्र.क्र.५४/२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २४ एप्रिल, २०१७

<u>वाचा :-</u>

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक सीसीआर १४०८/प्रक्र ४६२/२ स, दि. ११.१०.२०१३
२. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय समक्रमांक,दि. ३१.३.२०१७
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१७/प्र.क्र.७५/अर्थसंकल्प-३, दि.१८.४.२०१७
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा--प्रशा ५, दि.१०.५.२०१६
५. सहकार आयुक्त व निबंधक यांचे पत्र क्र सआ १५/सर्वसा/सह.पुरस्कार/उर्वरीत निधी मागणी/२०१७,दि. ११.४.२०१७

<u>प्रस्तावना:-</u>

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ अन्वये राज्य शासनाने सहकार क्षेत्रात उत्कृष्ट काम करणा-या संस्थांना पुरस्कार देऊन सन्मानित करण्याचा निर्णय घेतलेला आहे. सन २०१६-१७ मधील सहकार पुरस्कार वितरण कार्यक्रम सोलापूर जिल्हा मुख्यालयाच्या ठिकाणी दिनांक २६.०४.२०१७ रोजी आयोजित करण्यात आला आहे. सदर कार्यक्रमाचा खर्च भागविण्यासाठी उपलब्ध असलेला निधी तातडीने वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय:-</u>

दिनांक २६.०४.२०१७ रोजी सहकार पुरस्कार वितरण कार्यक्रम सोलापूर येथे आयोजित करण्यात आला आहे. या कार्यक्रमाचा खर्च भागविण्यासाठी “सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था (दत्तमत) ५०-इतर खर्च” या लेखाशिर्षामधून सन २०१७-१८ वर्षात मंजूर तरतूदीतून रुपये २५,००,००० (रुपये पंचवीस लाख) एवढया निधीचे वितरण करुन खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं २०१७/प्र.क्र.७५/अर्थसंकल्प-३, दि.१८.४.२०१७ अन्वये “५०-इतर खर्च” या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर

परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ पैकी परिच्छेद ९ वगळता इतर सर्व परिच्छेद या योजनेस लागु नाहीत. तसेच या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या सर्व संबंधित बाबींची पूर्तता होत आहे.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

४. वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा प्रशा ५, दिनांक १०.५.२०१६ मधील परिच्छेद "ब" मधील २ नुसार वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं २०१७/प्र.क्र.७५/अर्थसंकल्प-३ दि. १८.४.२०१७ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक १, २, ५, ६, ७ व ८ संदर्भात सदर बाबीसाठी होणारा खर्च ही अनिवार्य खर्चाची बाब असल्याने व "५० इतर खर्च" याखाली निधी वितरीत होणार असल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही.

५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्यालयाने वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र ३ व ४ येथील शासन परिपत्रकामधील सूचनांचे पालन करावे.

६. वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा प्रशा ५, दिनांक १०.५.२०१६ मधील परिच्छेद "अ" नुसार या प्रकरणी माहिती खालीलप्रमाणे आहे :-

(१) **विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं २०१७/प्र.क्र.७५/अर्थसंकल्प-३, दि.१८.४.२०१७ अन्वये "५०- इतर खर्च" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

(२) **मंजूर निधी** :- या योजनेच्या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या वित्तीय वर्षासाठी रु. २५ लाख इतका निधी उपलब्ध असून त्यापैकी यापूर्वी निधी वितरीत झाला नाही.

(३) **यास्तव** मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला नाही.

(४) ज्या लेखाशिर्षाखाली निधी वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापासूनचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. : - या बाबीसाठी सन २०१६-१७ मधील रु २२.५० लाख एवढा निधी संक्षिप्त देयकांद्वारे मंजूर करण्यात आला असून सदर निधी याच बाबीसाठी (सहकार पुरस्कार कार्यक्रमासाठी) मंजूर करण्यात आला आहे. सदर निधी व या आदेशाद्वारे वितरीत होणारा निधी याबाबत एकत्रित तपशिलवार देयक नंतर सादर करण्यात येणार आहे.

(५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे :- लागू नाही.

(६) वैयक्तिक लाभार्थींचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- याबाबत क्षेत्रीय कार्यालयांना सहकार आयुक्त स्तरावरुन सूचना देण्यात येत आहेत.

(७) बांधकाम विषयक प्रस्तांवाना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात करावा. :- लागू नाही.

(८) खरेदीविषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.

(९) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी :- लागू नाही.

७. सदर तरतूद अदा करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त अप्पर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच या बाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळो वेळी शासनास पाठवावी.

८. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष "२४२५ सहकार - उपलेखाशिर्ष ००१, (०१) संचालन व प्रशासन (०१)(०१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था (अनिवार्य)(दत्तमत) (२४२५ ००११) ५०-इतर खर्च" या लेखाशिर्षाखालील सन २०१७-१८ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावी.

९. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१७/प्र.क्र.७५/अर्थसंकल्प-३, दि.१८.४.२०१७ नुसार तसेच वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र २३०/१७/व्यय-२ दि. २०.४.२०१७ व अनौसं २०६/अर्थसं १३, दि. २१.४.२०१७ अन्वये वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२४१७१८३५११०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak M Rane

Digitally signed by Deepak M Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2aef4bf230b6667b08affe7946621e30ca1ff655241ee17d2cbdfd697d7222f5, cn=Deepak M Rane
Date: 2017.04.24 17:20:01 +05'30'

( दि.म.राणे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,पुणे.

२. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई. / महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर .
३. सह सचिव (व्यय-२ व अर्थ-१३) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
४. उपसचिव (अर्थसंकल्प-१७ स) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई.
५. कोषागार अधिकारी, पुणे.
६. निवड नस्ती कार्या २ स, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई.